**इंदिरा आवास योजनेतंर्गत घरकुलांच्या सध्याच्या वाटप पध्दतीमध्ये सुधारणा करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
पूरकपत्र क्रमांक :इंआयो-२०१०/प्र.क्र.३४ /योजना-१०
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ डिसेंबर , २०११.

**वाचा:** शासन निर्णय क्र. इंआयो २०१०/प्र.क्र.३४/योजना १०, दिनांक ९ एप्रिल, २०११.

**पूरकपत्र:-** शासन निर्णय क्र. :इंआयो-२०१०/प्र.क्र.३४ /योजना-१०, दिनांक ९ एप्रिल, २०११ अन्वये इंदिरा आवास योजनेंतर्गत घरकुलाची वाटप पध्दती जिल्हा घटक गृहीत धरुन विहित पध्दतीने करण्याबाबतच्या सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तथापि या योजनेतील घरकुलांचे वाटप करताना जिल्हा घटक न धरता तालुका घटक धरण्यात यावा अशी मागणी विविध लोकप्रतिनिधी तसेच जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाकडून निवेदनाव्दारे शासनास प्राप्त झालेली आहे. सदर प्राप्त निवेदने विचारात घेऊन सदर वाटप पध्दतीत थोडा बदल करुन घरकुल वाटप करताना जिल्हा घटकाऐवजी तालुका घटक गृहीत धरण्याबाबत आता शासन स्तरावर मान्यता देण्यात येत आहे. सन २०१२-१३ पासून अशा प्रकारे वाटप करण्यास मान्यता देण्यात येत आहे. जिल्हयांना दिलेले उद्दिष्ट सन २०१२-१३ पासून पूर्वीप्रमाणे सर्व तालुक्यांना त्या तालुक्यातील दारिद्रय रेषेखालील कुटूंबे व इंदिरा आवास योजनेच्या कायम प्रतिक्षा यादीतील शिल्लक बेघर संख्या घेऊन वाटण्यात यावे व तद्नंतर संबंधित तालुक्यांनी त्यांच्या तालुक्यातील ग्रामपंचायतनिहाय चढत्या क्रमाने ग्रामपंचायतींची यादी तयार करुन सर्वात कमी लाभार्थी संख्या असलेल्या ग्रामपंचायतीपासून सुरूवात करून दि. ९.४.२०१० च्या शासन निर्णयातील कार्यपध्दती नुसार तालुका अंतर्गत घरकुल वाटपाची सुरुवात करावी.

२. सन २०१२-१३ या आर्थिक वर्षापासून जिल्हा घटकाऐवजी तालुका घटक गृहीत धरुन घरकुलांचे वाटप करण्यात यावे. त्याकरिता शासन निर्णय क्र. :इंआयो-२०१०/प्र.क्र.३४ /योजना-१०, दिनांक ९ एप्रिल, २०११ यामधील अनु.क्र १ ते ५ मधील सूचना जिल्हयाऐवजी तालुका घटक गृहीत धरुन अंमलात आणण्यात याव्यात.

३. या व्यतिरिक्त संदर्भाधिन शासन निर्णयामधील इतर अटी व शर्ती यामध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

४. सदर पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक **२०१११२०७०७२६४९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(अविनाश सुभेदार)**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्याचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

अतिरिक्त मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सचांलक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
संचालक, आदिवासी विकास, नाशिक
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१ मुंबई,
महालेखापाल,(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य-१ मुंबई,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-२ नागपूर,
महालेखापाल,(लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य-२ नागपूर,
सर्व अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती,
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (हडको सेल), गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व) मुंबई,
अप्पर संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, पे ॲन्ड औकॉउटस् कॉम्पलेक्स, बॅरेक नं.१४.मुंबई-२१.
कार्यासन योजना -१० संग्रहार्थ,